मत्स्यखाद्य कारखाना स्थापन करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....
सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अर्थसहाय्य...

# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१७/ प्र.क्र. ९१ / पदुम १३
## मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
## दिनांक : २१ जून, २०१७

**वाचा**

१) आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. मत्स्य/ भू/०२०९०१/०८/२०१७, दि. २०.०१.२०१७

२) राष्ट्रीय कृषि विकास कक्षाचे क्र. RKVY-१२१६/C.R. १४६/RKVY CELL,दि. ०८.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये निर्गमीत केलेले इतिवृत्त

३) कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही-०३१७/सी.आर.१४/आरकेव्हीवाय सेल, दि. ०९.०६.२०१७ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना**

राज्यात ४.१८ लाख हेक्टर गोडया पाण्याचे क्षेत्र उपलब्ध आहे. सदर उपलब्ध क्षेत्राचा व्यावसायिकदृष्ट्या विकास करण्यासाठी पारंपरिक पद्धती व्यतिरिक्त पिंजरा पद्धतीने मत्स्यपालन (Cage Culture) योजना मोठ्या प्रमाणावर राज्यात राबविण्यात येत आहे. सदरची योजना प्रभावीपणे राबविताना मत्स्यपालनासाठी मोठ्या प्रमाणावर खाद्याची आवश्यकता असते. बंदिस्त तलावात मत्स्यसंवर्धनाकरीता शास्त्रीय व तांत्रिक पध्दतीने प्रथिनेयुक्त खाद्याची मात्रा माश्यांना योग्य प्रमाणात दिल्यास माश्यांची वाढ जलद व योग्य प्रमाणात होवून निश्चित उत्पादनाची खात्री वाढते.

राज्यामध्ये सद्यस्थितीत एकही मत्स्यखाद्य बनविणारी यंत्रणा उपलब्ध नसल्याने मत्स्यखाद्याच्या उपलब्धतेसाठी राज्याला इतर राज्यावर अवलंबून रहावे लागते. राज्यात मत्स्यखाद्य कारखाना स्थापन झाल्यास माशांकरीता पौष्टीक खाद्य उपलब्धतेबरोबरच राज्यात स्वयंरोजगार व रोजगार उपलब्ध होईल.

उक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन संदर्भाधीन १ येथील पत्रान्वये आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी भोरपाडले, कोल्हापूर येथे १२० मे. टन प्रति दिन क्षमतेचा एक मत्स्य खाद्य कारखाना स्थापन करण्यासाठी रू. १०.०० कोटी इतक्या अर्थसहाय्यासाठीचा सविस्तर प्रकल्प अहवाल राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत शासनास सादर केला होता. सदर प्रकल्प अहवाल दि. १३.०१.२०१७, दि. ०४.०२.२०१७ व दि. ०३.०३.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीसमोर सादर करण्यात आला असता संदर्भाधीन क्र २ येथील पत्रान्वये निर्गमीत करण्यात आलेल्या इतिवृत्तांन्वये त्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर प्रस्ताव दि. २५.०५.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीसमोर ठेवण्यात आला असता त्यास संदर्भाधीन क्र. ३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी सादर केलेला प्रस्ताव व राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने दिलेली मान्यता लक्षात घेता राज्यात भोरपाडले, कोल्हापूर येथे रु.१०.०० कोटी इतक्या रक्कमेचा मत्स्य खाद्य कारखाना स्थापन करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासन या निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत (RKVY) प्राप्त होणाऱ्या अर्थसहाय्यातून राज्यामध्ये भोरपाडले, कोल्हापूर येथे १२० मे. टन प्रति दिन क्षमतेचा मत्स्य खाद्य कारखाना स्थापन करण्यासाठी रू. १०.०० कोटी इतक्या रक्कमेचा मत्स्य खाद्य कारखाना स्थापन करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देत आहे. सदर प्रकल्पाकरिता राकृवियो हिस्सा व लाभार्थी हिस्सा खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प किंमत | राकृवियो हिस्सा | लाभार्थी हिस्सा |
|---|---|---|---|---|
| १ | मत्स्य खाद्य कारखाना स्थापना, भोरपाडले, जि. कोल्हापूर. | रू. १०.०० कोटी (१०० टक्के) | रू. ३.४४ कोटी (३४.४० टक्के) | रू. ६.५६ कोटी (६५.६ टक्के) |

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे उपरोक्त प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी राहतील. प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२२१५२७२४८४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.06.22 15:25:51 +05'30'

(र. व. गुरव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, पुणे
८. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय,कोल्हापूर
९. महालेखापाल १ /२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
१०.जिल्हा कोषागार अधिकारी,कोल्हापूर
११.उप कोषागार अधिकारी, कोल्हापूर
१२.सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१३.अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राकृवियो कक्ष,पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
१४.निवडनस्ती